**छत्रपती शाहू महाराज संशोधन प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे यांना सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात पुरवणी मागणी व्दारे मंजूर झालेले रू.१०६.०० कोटी अनुदान वितरित करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : पूरक २०२२/प्र.क्र.४१/का.१४२५**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक : ३० मार्च ,२०२२

**संदर्भ :-** १) शासन ज्ञापन क्रं सारथी-२०२१/प्र.क्र५४/का.१४२५ दि.१ जुलै २०२१ तसेच समक्रमांकाचे शासन ज्ञापन दि.७/१०/२०२१
२) छत्रपती शाहू महाराज संशोधन प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे यांचे पत्र क्रं सारथी,पुणे/लेखा निधी मागणी /२०२०-२१/१०९९ दि.२८/३/२०२२

**प्रस्तावना :-**

सामान्य प्रशासन विभाग यांचा शासन निर्णय क्रं बीसीसी-२०२०/प्र.क्र २९५/१६ ब दिनांक ९ /१०/२०२० अन्वये छत्रपती शाहू महाराज संशोधन प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे हा विषय इतर मागास व बहुजन कल्याण विभागाकडून नियोजन विभागाकडे हस्तांतरित करण्यात आला आहे.

नियोजन विभागाकडून छत्रपती शाहू महाराज संशोधन प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे या कंपनीस रु.१५०.०१कोटी इतके अनुदान सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात मंजूर करण्यात आले आहे. सदर अनुदानापैकी रु.५२.५०कोटी इतके अनुदान छत्रपती शाहू महाराज संशोधन प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे या कंपनीस शासन स्तरावर वितरित करण्यात आले आहे.

सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात छत्रपती शाहू महाराज संशोधन प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे या कंपनीस रु.१०६.०० कोटी इतके अनुदान पुरवणी मागणी व्दारे वित्त विभागाकडून मान्यता देऊन नियोजन विभागास वितरित करण्यात आलेले आहे.प्रस्तुत निधी रु.१०६.०० कोटी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी छत्रपती शाहू महाराज संशोधन प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे या कंपनीसाठी वितरित करण्याची बाब शासन विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे या कंपनीस रु. १०६.०० कोटी इतके अनुदान वित्त विभागाने पुरवणी मागणी व्दारे मंजूर केले आहे. प्रस्तुत अनुदान वितरित करण्याबाबत वित्त विभागाने मान्यता दिली आहे. सदर अनुदानाखालील होणारा खर्च खालील लेखाशिर्षातून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक ओ -२
२२२५, अनुसूचित जाती-अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण
०३, मागासवर्गीय यांचे कल्याण
१०२ आर्थिक विकास
(०१)(०१) "छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी)", कार्यक्रम (दत्तमत)(२२२५-F ५२१)
३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर)
संगणक सांकेतांक क्रं-२२२५ एफ ५२१

वरील अनुदान खर्च करण्यासाठी व्यवस्थापकीय संचालक " छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी)," पुणे यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे. तसेच मुख्य लेखा व वित्तीय अधिकारी "छत्रपती शाहू महाराज संशोधन प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी)," पुणे यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे.प्रस्तुत अनुदाने सदर लेखाशिर्षाखाली खर्च होईल याची दक्षता नियंत्रक अधिकारी यांनी घ्यावी . झालेल्या खर्चाचे "उपयोगीता प्रमाणपत्र" शासनास न चुकता सादर करावे .

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या क्रमांक अनौ.सं.क्र.१३६/२०२२/व्यय-८ दिनांक २४/३/२०२२च्या संदर्भान्वये केलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर हा शासन निर्णय उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२२०३३०११३८२९१८१६ असा आहे.हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Digitally signed by VIDHYADHAR MAHADEV BORKAR
Date: 2022.03.31 13:35:01 +05'30'

**(वि.म. बोरकर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.उप मुख्यमंत्री (नियोजन) यांचे सहसचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.राज्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३.अपर मुख्य सचिव (सा.बां.वि.) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान महालेखापाल, महाराष्ट्र १, (लेखापरीक्षा/ लेखा अनुज्ञेयता), मुंबई.
५. व्यवस्थापकीय संचालक , छत्रपतीशाहू महाराज संशोधन प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
७. सह सचिव / उप सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
९. वरिष्ठ कोषागार अधिकारी, मुंबई
१०. वरिष्ठ स्वीय सहायक प्रधान सचिव (नियोजन) यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई